**सन २०२०-२१ मध्ये प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत -प्रति थेंब अधिक पीक घटकाच्या अंमलबजावणीसाठी रु.१९१.३३ कोटी निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता प्रदान करणे....**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं- ०५२०/प्र.क्र.५८/१४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०००३२

तारीख: १८ जून, २०२०

**संदर्भ:-**

१) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.

२) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पीक - पाणी व्यवस्थापनाच्या पुरक बाबी (Volume-II) च्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.

३) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक १७-४/२०२०-RFS-III, दिनांक १८ मे, २०२०.

४) कृषि व पदुम विभागाचे पत्र क्र.PMKSY-०१२०/C.R.०१/१४-A, दि. १६ मार्च, २०२० अन्वये निर्गमित राज्य स्तरीय मान्यता समितीच्या (SLSC) ९ व्या बैठकीचे इतिवृत्त.

५) वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३ दि. ४ मे, २०२०

**प्रस्तावना:**

सन २०१५-१६ पासून प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत-प्रति थेंब अधिक पीक घटकाची अंमलबजावणी राज्यात करण्यात येत आहे. सदर घटकामध्ये सुक्ष्म सिंचन व पाणी व्यवस्थापनाच्या पुरक बाबी अशा दोन उपघटकांचा समावेश आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०: ४० असे आहे.

राज्यस्तरीय मान्यता समितीच्या (SLSC) दि. २६ फेब्रुवारी, २०२० च्या बैठकीत रु.८०० कोटी (केंद्र हिस्सा रु.४८० कोटी + राज्य हिस्सा रु.३२० कोटी) रकमेचा वार्षिक कृती आराखडा समितीच्या मान्येतेसाठी सादर करण्यात आला होता. यामध्ये सूक्ष्म सिंचनासाठी रु.६६६.६७ कोटी (केंद्र हिस्सा रु.४०० कोटी + राज्य हिस्सा रु.२१६.६७ कोटी) व पाणी व्यवस्थापनाच्या पुरक बाबीसाठी रु.१३३.३३ कोटी (केंद्र हिस्सा रु.८० कोटी + राज्य हिस्सा रु.५३.३३ कोटी) रकमेचा समावेश आहे. समितीने सदर आराखडयास मान्यता दिली आहे. तथापि, केंद्र शासनाने संदर्भाधीन दि. १८ मे, २०२० च्या पत्रान्वये या योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यापोटी रू.४०० कोटी नियतवाटप (Allocation) कळविलेले आहे. तसेच, सदर निधीपैकी कमाल २०% मर्यादेपर्यंत आवश्यकतेनुसार पाणी व्यवस्थापनाच्या पुरक बाबीसाठी वापरण्याचे

सूचित केले आहे. त्यानुसार, केंद्र हिश्श्याचा रू. ४०० कोटी व त्यास समरूप राज्य हिश्श्याचा रु.२६६.६७ कोटी अशा एकूण रू. ६६६.६७ कोटी रकमेचा कार्यक्रम सन २०२०-२१ या वर्षात राबविणे अपेक्षित आहे. तथापि, कोविड-१९ या संसर्गजन्य रोगामुळे सन २०२०-२१ या वित्तिय वर्षात होणाऱ्या अर्थव्यवस्थेवरील परिणामांबाबत उपाय योजना करण्याच्या दृष्टीने विभागाला कार्यक्रमांतर्गत योजनांसाठी सन २०२०-२१ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीच्या ३३% निधी उपलब्ध होईल या सुत्राच्या अधीन राहून विभागाने नियोजन करण्याचे वित्त विभागाने संदर्भाधीन दि. ४ मे, २०२० च्या शासन निर्णयान्वये सूचित केले आहे.

प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पिक घटकांतर्गत सन २०२०-२१ या वर्षात एकूण रु.५७४ कोटी अर्थसंकल्पिय तरतूद उपलब्ध असून ३३% मर्यादेत रु.१९१.३३ कोटी निधी उपलब्ध होईल. त्यानुसार PMKSY-PDMC योजनेंतर्गत रु.१९१.३३ कोटी निधीचा कार्यक्रम सन २०२०-२१ या वर्षात राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

I. प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत - प्रति थेंब अधिक पिक घटकाची राज्यात सन २०२०-२१ या वर्षासाठी अंमलबजावणी करण्यासाठी रु.१९१.३३ कोटी (केंद्र हिस्सा रु.११६ कोटी + राज्य हिस्सा रु.७५.३३ कोटी निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीची प्रवर्गनिहाय विगतवारी पुढीलप्रमाणे:-

(रक्कम रु. कोटीत)

| प्रवर्ग | केंद्र | राज्य | एकूण |
|---|---|---|---|
| **सर्वसाधारण** | १०० | ६६.६७ | **१६६.६७** |
| **अनुसुचित जाती** | ८ | ३.३३ | **११.३३** |
| **अनुसूचित जमाती** | ८ | ५.३३ | **१३.३३** |
| **एकूण** | **११६** | **७५.३३** | **१९१.३३** |

II. सन २०२०-२१ या वर्षाच्या मंजूर तरतूदीपैकी उपलब्ध होणाऱ्या निधी मधूनच सन २०१९-२० या वर्षातील अखर्चित असलेला व चालु वर्षात खर्च करण्यासाठी पुनर्जिवित करुन दिलेला निधी देखिल उपलब्ध करुन देण्यात येईल.

III. चालु वर्षी या योजनेंतर्गत निधी उपलब्धत करुन दिल्यानंतर तो प्रथमत: सन २०१९-२० या वर्षातील प्रलंबित प्रकरणांसाठी वापरण्यात यावा व प्रलंबित प्रकरणे निकाली निघाल्यानंतर निधी शिल्लक राहिल्यास शेतकऱ्यांकडून नवीन अर्ज स्विकारण्यासाठीचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी स्वतंत्रपणे सादर करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१८१५००२२१६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.06.18 15:45:09 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (कृषी / फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.राज्यमंत्री (कृषी व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.

३) सचिव (कृषी) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.

४) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

५) सचिव (जलसंधारण व रोजगार हमी योजना), जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६) सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

७) आयुक्त (कृषी),कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.

८) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.

९) जिल्हाधिकारी (सर्व)

१०) मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे

११) सर्व विभागीय कृषी सहसंचालक

१२) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)

१३) सर्व कृषी विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषी अधिकारी/सर्व तालुका कृषी अधिकारी/

१४) सर्व मंडळ कृषी अधिकारी

१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर

१७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई

१८) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई

१९) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.

२०) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर

२१) उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण /नाशिक /पुणे/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर

२२) सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२

२३) निवडनस्ती.